अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ नुसार ग्राम विकास व जलसंधारण विभाग (खुद्द) मधील सरळसेवा शिपाई व वाहनचालक पदावर शारीरिकदृष्टया अपंगांसाठी आरक्षण विहित करणे / सूट देणे

---

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
**क्र.पदनि १००६/प्र.क्र.२७०/ २००६/आस्था-१,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दि. १४ जानेवारी, २०११.**

वाचा: १) अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ (क्र.१/१९९६).

२) शासन परिपत्रक, सा.प्र.वि.क्र.एसआरव्ही-१०९७/प्र.क्र.१२/१६-अ, दिनांक २ मे, १९९८.

३) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.पदनि १००६/प्र.क्र.२७०/ २००६/आस्था-१, दि.३ डिसेंबर, २००८.

४) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.न्यायाप्र-२००९/प्र.क्र.५/सुधार-३, दि.३ ऑगस्ट, २०१०.

**प्रस्तावना:**

अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ (१९९६ चा क्र.१) हा अधिनियम दिनांक ७ फेब्रुवारी, १९९६ पासून लागू झाला आहे. या अधिनियमास अनुसरुन शासनाने संदर्भ क्र.२ येथील दिनांक २ मे, १९९८ च्या शासन परिपत्रकान्वये शासन सेवेत अंध / अल्पदृष्टी, बहिरेपणा, अस्थिव्यंग किंवा मंदमती या प्रवर्गात समाविष्ट होणा-या अपंग व्यक्तींना सरळसेवा भरतीमध्ये आरक्षण ठेवण्याबाबतच्या सूचना सर्व प्रशासकीय विभागांना दिल्या आहेत. अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ मधील कलम ३२ व ३३ मधील तरतुदीस अनुसरुन संदर्भ क्र.३ येथील दिनांक ३ डिसेंबर, २००८ च्या

शासन निर्णयान्वये ग्राम विकास व जलसंधारण विभाग (खुद्द) मधील "ड" (शिपाई) या संवर्गात सरळसेवा भरतीसाठी सुधारित अपंग आरक्षण लागू करण्यात आले आहे.

यासंदर्भात केंद्र शासनाने अपंग व्यक्ती अधिनियम १९९५ मधील तरतुदींस अनुसरुन त्यांच्या अखत्यारितील आस्थापनेवरील अपंग व्यक्तींसाठी पदे निश्चित करुन त्यांची यादी प्रसिध्द केली आहे. सदर यादीनुसार विभागाच्या आस्थापनेवरील जी पदे समान आहेत ती पदे अपंगांसाठी निश्चित करुन तसे आदेश निर्गमित करावेत अशा सूचना सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने दिनांक ३ ऑगस्ट, २०१० च्या शासन निर्णयान्वये दिल्या आहेत. त्यानुसार ग्राम विकास व जलसंधारण विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवरील गट "ड" मधील शिपाई पदास निश्चित करण्यात आलेल्या अपंगत्वाच्या प्रकारात केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार सुधारणा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:**

ग्राम विकास व जलसंधारण विभागाच्या आस्थापनेवरील गट "ड" च्या पदांमध्ये अपंग व्यक्तींसाठी पदे आरक्षित करण्यासाठी निर्गमित करण्यात आलेले संदर्भाधीन दिनांक ३ डिसेंबर, २००८ चा शासन निर्णय रद्द करण्यात येत आहे.

२. अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ च्या कलम ३३ नुसार ग्राम विकास व जलसंधारण विभागाच्या आस्थापनेवरील गड "ड" मधील शिपाई या संवर्गाकरिता सरळसेवा भरतीसाठी अंध, कर्णबंधीर व अस्थिव्यंग या अपंग प्रवर्गासाठी ठेवण्यात आलेल्या प्रत्येकी १% याप्रमाणे एकूण ३% आरक्षणाची विगतवारी आता खालीलप्रमाणे राहील.

| **अपंग प्रवर्ग** | **अपंगत्वाचा प्रकार/प्रमाण** | **आरक्षणची टक्केवारी** |
|---|---|---|
| अंध/Visually Handicapped | मंददृष्टी/अंध (Low Vision/Blind) | १% |
| कर्णबधीर/Hearing Handicapped | कर्णबधीर (Deaf) | १% |
| अस्थिव्यंग/Orthopaedically Handicapped | एका पायाने विकलांग असलेले (One leg affected) | १% |

३. अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ अनुसार अपंग व्यक्तींसाठी विभागाच्या आस्थपनेवर आरक्षित असलेल्या पदांवर नियुक्तीसाठी संबंधीत उमेदवाराने विहित प्राधिका-याचे सोबत जोडलेल्या नमुन्यातील प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक राहील. तसेच सेवाप्रवेश नियमानुसार विहित करण्यात आलेली अर्हता उमेदवाराने धारण करणे आवश्यक राहील. शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग क्र.अपंग १००९/प्र.क्र.२७६/०९/१६-अ, दिनांक १९ मार्च २०१० मधील तरतुदीनुसार अपंगांची आरक्षित पदे सरळसेवेने भरताना ती सामाजिक प्रवर्गात न दर्शविता ती स्वतंत्रपणे दर्शविण्यात येऊन निवड झालेल्या अपंग उमेदवारांना ते ज्या सामाजिक प्रवर्गातील असतील त्या प्रवर्गात समांतर आरक्षण म्हणून सामावून घेण्यात येईल.

४. गट "क" मधील "वाहनचालक" या पदाची कर्तव्ये व जबाबदारी लक्षात घेता, "वाहनचालक" या पदास अपंग प्रवर्गाचे आरक्षण लागू करण्यापासून सूट देण्यात येत आहे.

५. अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ नुसार असणा-या महत्वाच्या शब्दांच्या व्याख्या सोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये नमूद करण्यात आल्या आहेत.

६. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्यांचा संगणक संकेतांक 201101141737420001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(मो. का भोये)
उप सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
महाराष्ट्र शासन

G:\Handicapped Person.doc

प्रति,

प्रधान सचिव, (जलसंधारण), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मुंत्रालय, मुंबई
सचिव,(ग्राम विकास व पंचायत राज) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालय, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
उप सचिव सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग/सुधार-३, मुंत्रालय, मुंबई.
सर्व पर्यवेक्षकीय अधिकारी,ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
निवड नस्ती.

(ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.पदनि १००६/प्र.क्र.२७०/२००६/आस्था-१,
दिनांक १४ जानेवारी, २०११ सोबतचे परिशिष्ट)

## परिशिष्ट - अ

**अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ नुसार महत्वाच्या शब्दांच्या व्याख्या.**

1. **Person with dsability** :-"Person with disability" means a person suffering from not less than forty per cent of any disability as certified by a medical authority;
2. **Disability** "- "Disability" means
   i) Blindness;
   ii) Low vision;
   iii) Hearing impairment;

3. **Blindness**:- "Blindness" refers to a condition where a person suffers from any of the following conditions namely:
   i) Total absence of sight; or
   ii) Visual acuity not exceeding 6/60 or 20/200 (snellen) in better eyes with correcting lenses; or
   iii) Limitation of the field of vision subtending an angle of 20 degree or worse.
4. **Person with low vision** :-"Person with low vision" means a person with impairment of visual functioning even after treatment or standard refractive correction but who uses or is potentially capable of using vision for the planning or execution of a task with appropriate assistive device;
5. **Haring impairment** :- "Hearing impairment" means loss of sixty decibels or more in the better ear in the conversational range of frequencies;

**NAME & ADDRESS OF THE INSTITUTE / HOSPITAL**

**Certificate No.________________** **Date_________**

## DISABILITY CERTIFICATE

| |
|---|
| Recent Photograph of the candidate showing the disability duly attested by the Chairperson of the Medical Board. |

This is certified that Shri / Smt / Kum ________________________ son / wife / daughter of Shri __________________________ age _________ Sex______ identification mark(s) _______________ is suffering from permanent disability of following category:

A. Locomotor or cerebral palsy:

- (i) BL-Both legs affected but not arms.
- (ii) BA-Both arms affected (a) Impaired reach
  (b) Weakness of grip
- (iii) BLA-Both legs and both arms affected
- (iv) OL-one leg affected (right or left) (a) Impaired reach
  (b) Weakness of grip
  (c) Ataxic
- (v) OA-one arm affected (a) Impaired reach
  (b) Weakness of grip
  (c) Ataxic
- (vi) BH-Stiff back and hips (Cannot sit or stoop)
- (vii) MW-Muscular weakness and limited physical endurance.

B. Blindness or Low Vision:

- (i) B-Blind

(ii) PB-partially Blind

(P.T.O.)

C. Hearing impairment:

(i) D-Deaf

(ii) PD-Partially Deaf

(Delete the category whichever is not applicable)

2. This condition is progressive / non-progressive / likely to improve / not likely to improve. Re-assessment of this case is not recommended / is recommended after a period of _____________ years _____________ months.*

3. Percentage of disability in his / her case is _______ present.

4. Shri / Smt / Kum_____________________________ meets the following physical requirement for discharge of his / her duties:-

| | | |
|---|---|---|
| (i) | F-can perform work by manipulating with fingers. | Yes/No |
| (ii) | PP-can perform work by pulling and pushing. | Yes/ No |
| (iii) | L-can perform work by lifting. | Yes/ No |
| (iv) | KC-can perform work by kneeling and crouching. | Yes/ No |
| (v) | B-can perform work by bending. | Yes/ No |
| (vi) | S-can perform work by sitting. | Yes/ No |
| (vii) | ST-can perform work by standing. | Yes/ No |
| (viii) | W-can perform work by walking. | Yes/ No |
| (ix) | SE-can perform work by seeing. | Yes/ No |
| (x) | H-can perform work by hearing / speaking. | Yes/ No |
| (xi) | RW- can perform work by reading and writing. | Yes/ No |

| | | |
|---|---|---|
| (Dr.__________) | (Dr.__________) | (Dr.__________) |
| Member | Member | Chairperson |
| Medical Board | Medical Board | Medical Board |

Countersigned by the
Medical Superintendent / CMO / Head of
Hospital (with seal)

* Strike out which is not applicable.